सन २०१८-२०१९ या वर्षात राज्यातील कांदा उत्पादक शेतकऱ्यांना प्रति क्विंटल रुपये २००/- अनुदान देणेबाबत. आकस्मितता निधी.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक: सपस-२०१८/प्र.क्र.३६७/२४ स**
मंत्रालय, विस्तार, मुंबई-३२
दिनांक: १६ फेब्रवारी, २०१९

**संदर्भ:-** १) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग
क्रमांक:- सपस-२०१८/प्र.क्र.३६७/२४ स,दिनांक २६ डिसेंबर, २०१८
२) शासन ज्ञापन, वित्त विभाग, क्रमांक:- आकनि-२०१९/ प्र.क्र.१०/अर्थ १३, दिनांक १५ फेब्रुवारी २०१९

**प्रस्तावना:-**

राज्यातील कांदा उत्पादक शेतकऱ्यांना आर्थिक मदत देण्याच्यादृष्टीने दिनांक १ नोव्हेंबर २०१८ ते दिनांक १५ डिसेंबर, २०१८ या कालावधीत कृषी उत्पन्न बाजार समितीमध्ये कांदा विक्री केलेल्या शेतकऱ्यांना प्रति क्विंटल रुपये २००/- व जास्तीत जास्त २०० क्विंटल प्रति शेतकरी याप्रमाणे अनुदान संदर्भाधीन दिनांक २६/१२/२०१८ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आले आहे. या योजनेंतर्गत अनुदान वितरित करण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यातील कृषी उत्पन्न बाजार समित्या/खाजगी बाजार समितीमध्ये दिनांक १ नोव्हेंबर २०१८ ते दिनांक १५ डिसेंबर,२०१८ या कालावधीत कांदा विक्री केलेल्या शेतकऱ्यांना प्रति क्विंटल रुपये २००/- व जास्तीत जास्त २०० क्विंटल प्रति शेतकरी याप्रमाणे अनुदान मंजूर करण्यासाठी **रुपये ११४.८० कोटी (रुपये एकशे चौदा कोटी ऐंशी लाख फक्त** ) इतकी रक्कम आकस्मितता निधीतून शासन उपलब्ध करुन देत आहे.

२. या योजनेंतर्गत होणारा खर्च पुढे नमूद लेखाशिर्षाखाली उपलब्ध करुन देण्यात आलेल्या आकस्मितता निधीतून भागविण्यात यावा:-

**मागणी क्रमांक व्ही-२**
२४२५ सहकार
१०७ सहकारी पत संस्थांना सहाय्य
(०१) सहकारी पत संस्थांना सहाय्य
(०१)(०८) कांदा उत्पादक शेतकऱ्यांना अर्थसहाय्य दत्तमत (अनिवार्य) (२४२५ १४२१)
३३ अर्थसहाय्य
**आकस्मितता निधी संकेतांक(८००० ७५४७)**

३. या योजनेंतर्गत प्राप्त होणाऱ्या सर्व प्रस्तावांची छाननी करुन जिल्हानिहाय पात्र लाभार्थ्यांना अनुदान वितरित करण्यासाठी पणन संचालक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांना शासनाच्यावतीने प्राधिकृत करण्यात येत आहे. पणन संचालकांना सदर अनुदानाची रक्कम शासकीय कोषागारातून काढून या

रक्कमेचे शासनाच्यावतीने पात्र लाभार्थी शेतकऱ्यांना कोणत्याही परिस्थितीत दिनांक २८/०२/२०१९ पूर्वी वितरण करुन अहवाल शासनास सादर करावा.

४. या रक्कमेच्या देयकावर **आकस्मितता निधी अग्रीम शासन क्रमांक:-आकनि-२०१९/ प्र.क्र.१०/ अर्थसंकल्प-१३, दिनांक १५ फेब्रुवारी,२०१९ अन्वये मंजूर** असे लाल शाईने लिहावे व ते लाल शाईने अधोरेखित करावे.

५. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या अर्थसहाय्याचा विनियोग ज्या कारणास्तव मंजूर केलेला आहे, त्याच कारणासाठी करत असल्याबाबत पणन संचालक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी खात्री करावी व त्यासंदर्भातील अनुपालन अहवाल शासनास वेळोवेळी सादर करावा.

६. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-१२७(अ)/२०१९/व्यय-२, दिनांक ८/०२/२०१९ अनुसार त्यांच्या मान्यतेने व सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.mharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१९०२१६११२५४७०६०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anoop Kumar

Digitally signed by Anoop Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=257f78acf3ca20d9e91d7a73a76aa0240463e4aafdd4d13de68918dc20bad8e6, serialNumber=1c2ee608849bdb812849b6c8878f95607059b530ff717c8e39c09d06b394e02b, cn=Anoop Kumar
Date: 2019.02.16 11:35:27 +05'30'

**(अनूप कुमार)**
**प्रधान सचिव (पणन)**
**सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबारहिल, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग) मंत्रालय, मुंबई
४. मा.राज्यमंत्री (पणन) मंत्रालय, मुंबई
५. मा. सर्व मंत्री व राज्य मंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६. मा. राज्यमंत्री ( पणन ) यांचे मंत्रालय, मुंबई
७. मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
८. मा.अपर मुख्य सचिव ( वित्त ) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. मा.प्रधान सचिव(पणन)सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य पुणे
११.पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,(२ प्रती)

१२.कार्यकारी संचालक,महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळ, पुणे
१३.सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था
१४.सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था
१५.अध्यक्ष/सचिव, कृषि उत्पन्न बाजार समिती (सर्व)
१६.महालेखापाल, महाराष्ट्र-१ /२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा ), मुंबई/नागपूर,
१७.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१८.  वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प-११, मंत्रालय, मुंबई-३२
१९.अवर सचिव, १७ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
२०.निवड नस्ती २४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.